**नामनिर्देशनाद्वारे नियुक्त झालेल्या शासकीय कर्मचा-यांची वेतन निश्चिती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय क्रमांक: वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक २३ मार्च १९९४.

**प्रस्तावना**

महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम १० मध्ये प्रथम नियुक्तीनंतर प्रारंभीक वेतन निश्चित करण्याची तरतूद आहे. या नियमाखालील नियम ११ मध्ये कायम, अस्थायी अथवा स्थानापन्न या नात्याने पद धारण करणा-या शासकीय कर्मचा-यांची दुस-या पदावर संवर्गबाह्य पदावरसुध्दा कायम, अस्थायी अथवा स्थानापन्न या नात्याने पदोन्नती किंवा नियुक्ती झाल्यास त्यांचे प्रारंभीक वेतन निश्चित करण्याची तरतूद आहे. मात्र, शासकीय सेवेत असलेल्या कर्मचा-यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग अथवा तत्सम निवड मंडळामार्फत नामनिर्देशनाने दुस-या पदावर नियुक्ती झाल्यास त्यांचे वेतन कसे निश्चित करावे, या विषयी उपरोक्त नियमावलीत सुस्पष्ट तरतूद केलेली नाही. त्यामुळे अशा शासकीय कर्मचा-यांची नामनिर्देशनाद्वारे नियुक्ती झाली असता वेतन कसे निश्चित करावे याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

शासकीय कर्मचा-यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग अथवा तत्सम निवड मंडळामार्फत नामनिर्देशनाने दुस-या पदावर नेमणूक झाल्यास नवीन पदावरील करावयाच्या वेतन निश्चितीबाबत सर्वकष विचार करुन शासन आता असे आदेश देत आहे की, ज्या शासकीय कर्मचा-याची महाराष्ट्र लोकसेवा आयोग अथवा तत्सम निवड मंडळामार्फत नामनिर्देशनाने दुस-या संवर्गांतर्गत अथवा संवर्गबाह्य पदावर नियुक्ती झालेली आहे, त्या कर्मचा-यांची त्या नवीन पदावरील वेतन निश्चिती पुढील अटींच्या अधीन राहून करण्यात यावी :-

(१) शासकीय कर्मचा-याने लोकसेवा आयोग किंवा तत्सम निवड मंडळाने विहित केलेल्या मार्गाने अर्ज केलेला असावा.

(२) महाराष्ट्र लोकसेवा आयोग/ तत्सम निवड मंडळे यांनी अशा नियुक्तीसाठी शिफारस करताना जर वेतन निश्चितीच्या संदर्भात सुस्पष्ट शिफारस केलेली असेल तर त्या शिफारशीप्रमाणे वेतन निश्चिती करण्यात यावी.

(३) शासकीय कर्मचारी सध्या धारण करीत असलेल्या पदापेक्षा उच्च पदावर किंवा समकक्ष पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने/ तत्सम निवड मंडळाने सुस्पष्टपणे वेतन निश्चितीची शिफारस केली नसेल तर महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ तील नियम ११ खालील विविध तरतूदींनुसार जुन्या पदाच्या जबाबदारीच्या संदर्भात नवीन पदांच्या जबाबदारीचे मूल्यमापन लक्षात घेऊन लागू होणा-या तरतूदींच्या अनुषंगाने वेतन निश्चती करण्यात यावी. नवीन पद अधिक महत्वाची कर्तव्ये व जबाबदा-या असणारे असेल तर सध्याच्या पदावरील काल्पनिक वेतनवाढीचा लाभ दिला जाईल, अन्यथा वेतन निश्चतीत सध्याच्या पदावरील काल्पनिक वेतनवाढीचा लाभ देता येणार नाही.

(४) कमी जबाबदारीच्या किंवा वेतनश्रेणीच्या पदावर नियुक्ती झाली असल्यास पूर्वीच्या सलग सेवेत जेवढ्या वेतनवाढी घेतल्या असतील तेवढ्या कालावधीतील नियुक्ती पदावरील वेतनश्रेणीतील वेतनवाढी वेतननिश्चितीसाठी विचारात घ्याव्यात.

(५) वरील अनुक्रमांक ३ व ४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे वेतननिश्चिती करण्यात आल्यास पुढील वेतनवाढीचा दिनांक हा नियुक्ती पदावरील पूर्ण वर्ष काम केल्यावरच राहील.

(६) वरीलप्रमाणे वेतननिश्चिती झाल्यावर, नवीन नियुक्तीसाठी परिविक्षाधीन कालावधी असल्यास परिविक्षाधीन कालावधीतील वेतनवाढी महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, ९८१ च्या नियम ३९ प्रमाणे नियमित केल्या जाव्यात.

(७) उच्च, समकक्ष वा कमी जबादारीच्या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती झाली असल्यास त्या पदाच्या वेतनश्रेणीत वेतननिश्चिती करताना जर त्या टप्प्यात ताबडतोब दक्षता रोध असेल तर, असा दक्षता रोध जमेस न धरता वेतननिश्चिती करण्यात यावी. मात्र, एकदा वेतननिश्चिती झाल्यावर त्या पुढील टप्प्यात दक्षता रोध आल्यास त्या पदावर (२ वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी असल्यास तो धरुन) किमान ३ वर्षे सेवा केली असणे आवश्यक राहील.

(८) पूर्वीची सेवा व नवीन नियुक्तीमध्ये २४ तासांपेक्षा अधिक खंड असल्यास महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम १४ च्या तरतूदीनुसार वेतननिश्चिती करण्यात यावी.

२.	वरील तरतूदी विचारात घेऊन शासन असेही आदेश देत आहे की, सेवेत असणा-या कर्मचा-यांची नामनिर्देशनाने, महाराष्ट्र लोकसेवा आयोग/ तत्सम निवड मंडातर्फे नियुक्ती झाल्यास, जरी त्या कर्मचा-याची वेतननिश्चिती, लोकसेवा आयोगाच्या/ तत्सम निवड मंडळाच्या यादीतील गुणानुक्रमे ज्येष्ठ असणा-या कर्मचा-यांच्या वेतनापेक्षा, नवीन वेतनश्रेणीच्या निम्नतम टप्प्यापेक्षा वरच्या टप्प्यावर झाली असली तरी, त्यानुसार वेतननिश्चिती मागण्याचा अधिकार, नामनिर्देशनाने प्रथमच शासन सेवेत, त्या पदावर नियुक्त होणा-या, ज्येष्ठ अधिका-यास असणार नाही.

३.	महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत/निवड मंडळामार्फत नामनिर्देशनाने दुस-या पदावर नियुक्त झाल्यास त्यांची वेतननिश्चिती करण्यास मंत्रालयाच्या प्रशासनिक विभागांस पूर्ण अधिकार असतील.

४.	हे आदेश या आदेशाच्या दिनांकापासून अंमलात येतील. मात्र महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत वा तत्सम निवडमंडळामार्फत नामनिर्देशनाने दुस-या पदावर नियुक्त झालेल्या शासकीय कर्मचा-यांची वेतन निश्चिती, हे आदेश निर्गमित होण्यापर्यंतची सर्व प्रलंबित प्रकरणे पूर्ण विचार विचार करुन योग्य त्या समर्थनासह प्रशासनिक विभागानी, वित्त विभागाची सहमती घेऊन निकाली काढावीत.

५.	महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या संबंधीत नियमामध्ये यथावकाश आवश्यक त्या सुधारणा करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**कांता वाघमारे**
शासनाचे उप सचिव,
वित्त विभाग.

प्रति,

१) महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
३) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
४) महालेखापाल -२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७) राज्यपालांचे सचिव.
८) मुख्यमंत्र्यांचे सचिव,
९) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
१०) मंत्रालयीन सर्व विभाग

११) सर्व विभागीय आयुक्त
१२) मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.
१३) *प्रबंधक, उच्च न्यायालय, (मूळ न्याय शाखा),मुंबई,
१४) *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा) मुंबई,
१५) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१६) *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१७) *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१८) सिनीयर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग)
खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
१९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.,
२०) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
२१) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
२२) जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
२३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,

*पत्राद्वारे.

-------------